**अन्न, नागरी पुरवठा व ग्राहक संरक्षण विभागांतर्गत मुंबई-ठाणे शिधावाटप क्षेत्रातील उप नियंत्रक शिधावाटप, ग-परिमंडळ, कांदिवली, मुंबई या पदावर प्रतिनियुक्तीने नियुक्ती करणेबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**अन्न, नागरी पुरवठा व ग्राहक संरक्षण विभाग**
**शासन आदेश क्रमांक : निशिका-२०२३/प्र.क्र.१६१/ना.पु.१५.**
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरू चौक,
मंत्रालय, मुंबई - ४०० ०३२.
दिनांक : ११ मे, २०२३.

**वाचा:-** १) महाराष्ट्र नागरी सेवा (पदग्रहण अवधी, स्वीयेत्तर सेवा आणि निलंबन, बडतर्फी व सेवेतून काढून टाकणे यांच्या काळातील प्रदाने) नियम, १९८१.
२) शासन आदेश, महसूल वन विभाग क्र. टिआरएफ-०४२३/प्र.क्र.९७/ई-२, दि.०४.०५.२०२३.

**शासन आदेश** :

महाराष्ट्र नागरी सेवा (पदग्रहण अवधी, स्वीयेत्तर सेवा आणि निलंबन, बडतर्फी व सेवेतून काढून टाकणे यांच्या काळातील प्रदाने) नियम, १९८१ च्या नियम-४० मधील परिशिष्ट-२ मधील विहित अटी व शर्तीच्या अधीन राहून श्री. श्याम मदनुरकर, उपविभागीय अधिकारी, मौदा, नागपूर यांची महसूल व वन विभागाच्या वाचा क्र. २ येथील शासन आदेशान्वये उप नियंत्रक, शिधावाटप, ग परिमंडळ, मुंबई या पदावर तीन वर्षाच्या कालावधीसाठी प्रतिनियुक्तीने नियुक्ती करण्यात आली आहे.

श्री. श्याम मदनुरकर यांचा उप नियंत्रक शिधावाटप, ग-परिमंडळ, कांदिवली, मुंबई या पदावर प्रतिनियुक्तीचा कालावधी तीन वर्षाचा असेल मात्र याबाबत एका वर्षानंतर पुनर्विलोकन करण्यात येईल. त्यांची प्रतिनियुक्तीने नियुक्ती खालील नमूद अटी व शर्तीच्या अधीन राहील:-

(१) श्री. श्याम मदनुरकर यांना दि.१० मे, २०२३ रोजी (म.पू.) प्रतिनियुक्तीच्या पदावर रुजू घेण्यात येत असून दि.१० मे, २०२३ पासून त्यांच्या प्रतिनियुक्तीच्या सेवेचा प्रारंभ होईल आणि ज्या तारखेला ते आपल्या मूळ शासकीय पदाचा कार्यभार पुन्हा स्विकारतील त्या तारखेला त्याची प्रतिनियुक्तीवरील सेवा समाप्त होईल.

(२) जर त्यांची सेवा लोकसेवेच्या हिताच्या दृष्टीने शासनाला आवश्यक वाटली तर प्रतिनियुक्तीचा कालावधी संपण्यापूर्वी कोणत्याही वेळी त्यांना परत बोलावण्याचा अधिकार शासन / सक्षम प्राधिकाऱ्यास राहील.

(३) जर त्यांची प्रतिनियुक्तीवरील सेवा स्वियेत्तर नियोक्त्याला आवश्यक वाटली नाही तर त्यांना मूळ विभागाकडे परत पाठविण्याची मुभा स्वियेत्तर नियोक्त्याला राहील. मात्र

याप्रमाणे परत पाठविण्यापूर्वी स्वियेत्तर नियोक्त्याने शासनाला / सक्षम प्राधिकाऱ्याला तीन महिन्यांची नोटीस दिली पाहिजे.

(४) श्री. श्याम मदनुरकर यांनी मूळ विभागाकडे परत जाण्याचा आपला उद्देश आहे, अशी कमीत कमी तीन महिन्याची लेखी नोटीस शासनाला / सक्षम प्राधिकाऱ्याला दिल्यानंतर त्यांच्या सेवा मूळ विभागाकडे परत करण्यात येतील.

५) प्रतिनियुक्तीच्या पदावर रुजू झाल्याचा अहवाल अन्न, नागरी पुरवठा व ग्राहक संरक्षण विभाग व महसूल व वन विभागास सादर करावा.

(६) श्री. श्याम मदनुरकर यांना प्रतिनियुक्ती भत्ता अनुज्ञेय असणार नाही.

२. सदर शासन आदेश महसूल वन विभाग क्र. टिआरएफ-०४२३/प्र.क्र.९७/ई-२, दि.०४.०५.२०२३ रोजीच्या शासन आदेशानुसार काढण्यात येत आहे.

सदर शासन आदेश महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०२३०५१११७२४५०१९०६ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

TATOBA MARUTI KOLEKAR

Digitally signed by TATOBA MARUTI KOLEKAR
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=FOOD CIVIL SUPPLIES AND CONSUMER PROTECTION DEPARTMENT, 2.5.4.20=f6809ddecc0e0507860e37e9935ab3a7013510f4fe04fad27512588a0bc8e15f, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=9915405908628D01955F3675ACC122F51E0C39F63F7CC88EEC49CD05616991FD, cn=TATOBA MARUTI KOLEKAR
Date: 2023.05.11 17:31:08 +05'30'

**(ता. मा. कोळेकर)**
**सह सचिव, महाराष्ट्र शासन.**

**प्रत :-**

१) मा. मुख्यमत्री यांचे अ.मु.स.
२) मा. उपमंख्यमंत्री यांचे प्रधान सचिव.
३) मा.मंत्री (अ.ना.पु.व ग्रा.सं.) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय,मुंबई.
४) नियंत्रक, शिधावाटप व संचालक नागरी पुरवठा, मुंबई
५) सचिव (अ.ना.पु.व ग्रा.सं.) यांचे स्वीय सहाय्यक, मंत्रालय,मुंबई.
६) महालेखापाल, महाराष्ट्र-१ व २ ( लेखा व अनुज्ञेयता ) महाराष्ट्र राज्य, मुंबई/नागपूर.
७) महालेखापाल , महाराष्ट्र-१ व २ ( लेखा परीक्षा ) महाराष्ट्र राज्य, मुंबई/नागपूर.
८) अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई.
९) निवासी लेखा परीक्षा अधिकारी, मुंबई.
१०) सर्व उप नियंत्रक शिधावाटप.
११) श्री. श्याम मदनुरकर (नियंत्रक, शिधावाटप व संचालक नागरी पुरवठा, मुंबई यांचेमार्फत)
१२) विभागातील सर्व कार्यासने.
१३) निवड नस्ती, कार्यासन नापु- १५.